पार्लमेंट स्टँडींग कमिटी, मुंबई भेट
यांच्यासाठी आयोजित करण्यात आलेल्या
सांस्कृतिक कार्यक्रमांचे अयोजन व त्यावरील
खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता
देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

## शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र. ४९४/सां.का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २५ जुलै, २०२३

**वाचा :-** सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ ३७५३, दिनांक ३ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" अंतर्गत विविध उपक्रम/कार्यक्रमांचे आयोजन विभागाकडून मोठया प्रमाणावर करण्यात येत आहेत. सदर कार्यक्रमांचे प्रयोजन राज्यातीलच नव्हे तर इतर राज्यातील अतिथींना महाराष्ट्राची संस्कृती कळावी या हेतुने विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येत आहे. त्याच पार्श्वभूमीवर प्रशासकीय दौऱ्यावयर असलेल्या संसदीय स्थायी समिती सदस्यांसाठी राज्याच्या लोककलेचा प्रचार व प्रसार व्हावा या हेतुने सांस्कृतिक कार्य विभागामार्फत दि. ५ जुलै, २०२३ रोजी हॉटेल ट्रायडंट येथे महाराष्ट्राची लोकधारा हा सांस्कृतिक कार्यक्रम व सॉफ्ट म्युझिक ( डिनर वेळी) सादर करण्यात आला. सदर कार्यक्रम व त्यावरील आयोजन खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दि. ५ जुलै, २०२३ रोजी हॉटेल ट्रायडंट येथे "महाराष्ट्राची लोकधारा" हा सांस्कृतिक कार्यक्रम व सॉफ्ट म्युझिक यावरील आयोजन खर्च रुपये १२,५०,०००/- ( अक्षरी रुपये बारा लाख पन्नास हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर आयोजन खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२)

राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७२६११५६४११७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA
SURYAKANT
DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7f
f442b98831311214458302, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE189926
9D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA
SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.07.26 11:57:37 +05'30'

**( अनिरुध्द सु.देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा .प्रधान सचिव यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. अवर सचिव( (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल १ - (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४